महाराष्ट्र शासन

**महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत आयोजित केल्या जाणाऱ्या परीक्षांच्या गोपनीय कामासाठी विषयतज्ञांच्या सेवा उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : मलोआ ११२३ /प्र.क्र.९८ /आठ**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०४ मे, २०२३.

**प्रस्तावना :**

शासन सेवेमध्ये सुयोग्य व्यक्तींची पारदर्शक व निकोप पध्दतीने निवड करण्याच्या कामाकरिता भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३१५ नुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची निर्मिती करण्यात आली आहे. संविधानाच्या अनुच्छेद ३२० मध्ये विहित करण्यात आलेल्या तरतूदीनुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे कामकाज चालते.

०२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगास सोपविण्यात आलेले कामकाज विना अडथळा व कालमर्यादेत पार पाडण्यासाठी महाराष्ट्रातील कृषी विद्यापीठे, अकृषिक विद्यापीठे, सार्वजनिक विद्यापीठे, तांत्रिक विद्यापीठे, स्वायत्त विद्यापीठे, शासकीय शैक्षणिक संस्था, शासन अनुदानित शैक्षणिक संस्था, शासन मान्यताप्राप्त विनाअनुदानीत शैक्षणिक संस्था व स्वायत्त शैक्षणिक संस्था यांच्या आस्थापनांवर कार्यरत असलेल्या विविध विषयांतील विषय तज्ञांची मदत महाराष्ट्र लोकसेवा आयोगास वेळोवेळी घ्यावी लागते. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या गोपनीय व संवेदनशील कामासाठी वरील शैक्षणिक संस्थांमधील संबंधित विषयातील तज्ञ व्यक्तींच्या सेवा आयोगाच्या गरजेनुसार संबंधित तज्ञांशी थेट संपर्क साधून आयोगामार्फत परस्पर उपलब्ध करुन घेण्यात येतात. या कामासाठी तज्ञांना आयोगाकडून शासनमान्य दराने दैनिक व प्रवास भत्या व्यतिरिक्त विहित दराने मानधन देखील अदा करण्यात येते.

०३. तथापि आयोगाच्या गोपनीय व संवेदनशील कामकाजासाठी काही वेळा काही शैक्षणिक संस्थांमधील संबंधित विषयांतील तज्ञांची सेवा उपलब्ध करुन घेताना आवश्यक सहकार्य मिळत नसल्याचे निदर्शनास आले आहे. याचा एकूणच परिणाम परीक्षांच्या वेळापत्रकावर होतो. परिणामी शासन सेवेत कामकाज करण्यासाठी आवश्यक उमेदवार वेळेवर मिळू शकत नाहीत. त्यामुळे पुरेशा मनुष्यबळा अभावी शासकीय कामकाजाच्या गतीमानतेवर परिणाम होत आहे. या सर्व बाबींचा विचार करुन विविध शैक्षणिक संस्थांमधील विषयतज्ञांच्या सेवा महाराष्ट्र लोकसेवा आयोगास उपलब्ध व्हाव्यात याकरिता खालीलप्रमाणे सूचना या परिपत्रकाद्वारे देण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रक :**

१. महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत केली जाणारी भरती प्रक्रिया राज्य शासनाच्या सेवेतील पदांवर सुयोग्य उमेदवारांची पारदर्शक व निकोप पध्दतीने निवड करण्यासाठी राबविण्यात येते. त्यामुळे सदरहू कामकाज आयोगाला सक्षमपणे विहित कालमर्यादेत करता यावे याकरिता राज्यातील कृषी विद्यापीठे, अकृषिक विद्यापीठे, सार्वजनिक विद्यापीठे, तांत्रिक विद्यापीठे, स्वायत्त विद्यापीठे, शासकीय शैक्षणिक संस्था, शासन अनुदानित शैक्षणिक संस्था, शासन मान्यताप्राप्त विनाअनुदानित शैक्षणिक संस्था व स्वायत्त शैक्षणिक संस्था यामधील शैक्षणिक संस्थाप्रमुख व संबंधित विषय तज्ञांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगास आवश्यक ते सहकार्य करावे.

२. राज्यातील सर्व कृषी, अकृषिक विद्यापीठे, सार्वजनिक अभिमत विद्यापीठे, तांत्रिक विद्यापीठे, स्वायत्त विद्यापीठे, शासकीय शैक्षणिक संस्था, शासन अनुदानित शैक्षणिक संस्था, शासन मान्यताप्राप्त विनाअनुदानित शैक्षणिक संस्था, स्वायत्त शैक्षणिक संस्था इत्यादी सर्व शैक्षणिक संस्थांमधील अध्यापकीय संवर्गातील विषयतज्ञांना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून सोपविण्यात आलेली गोपनीय व संवेदनशील कामे आयोगाने विहित केलेल्या कालमर्यादेत व दर्जात्मक स्वरुपात पूर्ण करुन देणे बंधनकारक राहील. तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने विहित केलेल्या कालमर्यादेत संबंधित विषयतज्ञांची सेवा आयोगास उपलब्ध करुन देणे उपरोक्त शैक्षणिक संस्था प्रमुखांवर बंधनकारक राहील.

३. महाराष्ट्र लोकसेवा आयोगास विषयतज्ञांच्या सेवा उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने उपरोक्त सूचनांची प्रभावीपणे अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने सर्व संबंधित प्रशासकीय विभागांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाशी निगडीत कामकाजासाठी समन्वयक म्हणून क्षेत्रीय स्तरावरील वरिष्ठ दर्जाच्या अधिका-यांची नियुक्ती करावी. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कामकाजाच्या आवश्यकतेनुसार विषयतज्ञांच्या सेवा आयोगास उपलब्ध करुन देण्याबाबत आवश्यक सहकार्य करण्याची जबाबदारी अशा समन्वयकांवर राहील.

०४. वरील सर्व सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

०५. सदर परिपत्रक उच्च तंत्र शिक्षण विभाग, वैद्यकीय शिक्षण विभाग व कृषी विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०५०४१५०५३१४५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LEENA ASHISH SANKHE

Digitally signed by LEENA ASHISH SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=522242e2259dbf8fc1aed336674ebf6138607b16aacbbed00301a9e43c62f6c7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=783CA3332598C7E1C28393EA543FA05D9FB77F36A848F4738D12288E105699F4, cn=LEENA ASHISH SANKHE
Date: 2023.05.04 15:14:08 +05'30'

**(लिना संखे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, मलबार हिल मुंबई,
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव वै.शि व औ.द्र विभाग,
५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
६. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव कृषी व पदुम विभाग.
७. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव मंत्रालय, मुंबई.
८. सचिव (महाराष्ट्र लोकसेवा आयोग)
९. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
१०. निवडनस्ती कार्या-०८.